**ग्रामीण रुग्णालय खंडाळा, जि. सातारा येथील ट्रामा केअर युनिट बांधकामाचे अंदाजपत्रक व आराखडयांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२०/प्र.क्र.१७६/आरोग्य-४
मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
दिनांक : २५ मार्च २०२२.

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभागाचा शासन निर्णय क्र:संकीर्ण-२०१२/प्र.क्र.१४१/आरोग्य-३, दि.१७.०१.२०१३.
२) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकःसंआसे/कक्ष-३/टे-६/ग्रारुखंडाळाट्राकेयुबांधकाम/५१४५-४६/२०, दि.१४.०७.२०२०.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण रुग्णालय खंडाळा, जि. सातारा येथे ट्रामा केअर युनिट स्थापन करण्यास, संदर्भाधिन अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. ग्रामीण रुग्णालय खंडाळा, जि. सातारा येथील ट्रामा केअर युनिट बांधकामाचे रू.१४८७.५१ लक्ष इतक्या रकमेचे अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा यांनी तयार केले असून मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे यांनी तांत्रिकदृष्टया मंजूरी दिली आहे. सदरच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण रुग्णालय खंडाळा, जि. सातारा येथील ट्रामा केअर युनिट रूग्णालयाच्या बांधकामाकरीता रु.१४८७.५१ लक्ष (रुपये चौदा कोटी, सत्याऐशी लाख, एकावन्न हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रक व आराखडयास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच, विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दि.०७.०७.२०१७ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
३) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन, सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
४) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी घेणे आवश्यक राहील.

५) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

६) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.

७) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिक दृष्टया मान्यता देताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतूदी अंतिम करण्यात याव्यात.

८) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभागाचा शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी. तसेच काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करुन घ्यावी.

९) नियोजन विभागाच्या दि.११.०६.२०१८ च्या शासन निर्णयामधील सुत्रानुसार नवीन बांधकाम हाती घेण्यासाठी निधी उपलब्ध झाल्यानंतर काम हाती घेण्यात येईल.

२. सदर कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०२ - ग्रामीण आरोग्य सेवा - ०४ सार्वजनिक आरोग्य, १०४ - सामुहिक आरोग्य केंद्र (००) (०१) मोठी बांधकामे (४२१००३९१), ५३- मोठी बांधकामे" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१३३८३०६२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a8969 8a28c94703436c07cda664672d20 607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d 7f76b869fa2e5835af215c6a80eae 8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2022.03.25 14:25:04 +05'30'

( प्र.मो.बलकवडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. संचालक आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.

६. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ),आरोग्य सेवा, पुणे.
७. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
९. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, सातारा.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
११.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.
१२.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
१३.सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१५.अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.अवर सचिव (आरोग्य-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.